**श्री.ए.के.चव्हाण, अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ यांच्या प्रतिनियुक्तीने नेमणूकीबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राजस १८१४/प्र.क्र.४३/५-स

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ११ नोव्हेंबर, २०१४

**वाचा :**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक राजस-१०१२/प्र.क्र.१/५-स, दि.०३/०७/२०१२.

२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आदेश क्रमांक अर्थ /वलिच/नाशिक जिमस/२२४७/प्रशा.नि/१३,दिनांक १४/११/२०१३.

३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आदेश क्रमांक अर्थ/मुदे/मस्कार्ड/अवसायक/२०१४, दिनांक २७/०५/२०१४.

४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक आस्थापना/कक्ष-२/अ-१/नि.बदली/२०१४, दिनांक १०/०६/२०१४.

**प्रस्तावना :**

श्री.ए.के.चव्हाण, अपर निबंधक यांची संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक ०३/०७/२०१२ च्या आदेशान्वये सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक या पदावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात आली होती. ते सदर पदावर दि.१२/०७/२०१२ ते दि.०७/०२/२०१४ पर्यत कार्यरत होते. दरम्यान सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.१४/११/२०१३ रोजीच्या आदेशान्वये श्री.चव्हाण यांच्याकडे अध्यक्ष, प्रशासक मंडळ नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.,नाशिक या पदाचा कार्यभार दिला. महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाने त्यांना दि.०७/०२/२०१४ पासून कार्यमुक्त केले. तथापि अध्यक्ष, प्रशासक मंडळ नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.,नाशिक या पदाचा कार्यभार ते सांभाळत होते. श्री.एस.डी.माने, अपर आयुक्त व विशेष निबंधक तथा अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशिय बँक मर्या., मुंबई यांची दि.१८/३/२०१४ च्या शासन निर्णयान्वये पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे या पदावर बदली झाल्याने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांनी दि.२७/५/२०१४ च्या आदेशान्वये श्री.ए.के.चव्हाण यांना अवयायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशिय बँक मर्या., मुंबई या पदाचाही कार्यभार दिला आहे. श्री.चव्हाण यांना महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाने दि.०७/०२/२०१४ पासून कार्यमुक्त केल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार श्री.चव्हाण यांच्या प्रतिनियुक्तीच्या पदावरील नेमणूकीचे आदेश शासन स्तरावरुन निर्गमित करणे आवश्यक असल्याने सहकार आयुक्तांकडून शासनास प्रस्ताव

सादर करण्यात आला होता. त्यानुसार श्री.चव्हाण यांची प्रतिनियुक्तीने नेमणूकीबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) मधील तरतूद त्याचप्रमाणे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय कारणास्तव श्री.ए.के.चव्हाण, अपर निबंधक, सहकारी संस्था गट-अ यांची दि.८/२/२०१४ पासून अध्यक्ष, प्रशासक मंडळ नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.,नाशिक या पदावर प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११११७३८२६५३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2014.11.11 17:46:31 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. अध्यक्ष, प्रशासकीय मंडळ नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., नाशिक,
३. विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था (प्रशासन /लेखापरीक्षण), नाशिक
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६. संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक,सह.संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक
८. निवड नस्ती (कार्यासन-५स).